**कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांच्या कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील पदांना दिनांक ०१.०३.२०२३ ते ३१.०८.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: मुदतवाढ - २०२३/प्र.क्र.११६ /मो.प्र.२**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २१.०३.२०२३.

**पहावे** : १. शासन निर्णय, पाटबंधारे विभाग, मंत्रालय, मुंबई क्र.आढावा १००२/(३३५/२००२)आ(प्रशि), दि.०६/०२/२००३.
२. शासन निर्णय क्रमांक - मुदतवाढ २०२२/प्र.क्र.३०८/मोप्र-२, दिनांक ०७.१०.२०२२.
३. विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचे पत्र क्रमांक-९६४/विपाविम/काआ-३(१)/ महामंडळ १० पदे/ मुदतवाढ/२०२३, दिनांक ०३.०२.२०२३.
४. वित्त विभागाचा शासन निर्णय क्र पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०८.०२.२०२३.

**प्रस्तावना :-**

संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये जलसंपदा विभागाच्या अधिपत्याखालील क्षेत्रिय आस्थापनेचा आढावा व आकृतीबंध निश्चित करण्यात आलेला आहे. संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयान्वये कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांच्या कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील १० पदांना दिनांक २८.०२.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. संदर्भ क्रमांक ४ च्या वित्त विभागाचे शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०२३ ते दिनांक ३१.०८.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आले आहेत.

**शासन निर्णय :-**

आता संदर्भीय क्र.३ अन्वये कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांनी प्रस्तावित केल्यानुसार सोबतच्या **परिशिष्ट- अ** मधील नियत अस्थायी आस्थापनेवरील १० पदांना दिनांक ०१.०३.२०२३ ते दि. ३१.०८.२०२३ पर्यंत चालू ठेवण्यास खालील अटींचे अधिन राहून मुदतवाढ देण्यात येत आहे.

१) उपरोक्त सर्व पदे विभागाने प्रस्तावित केलेल्या कालावधीत कार्यरत असतील.
२) रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवरील पदे कर्मचारी कार्यरत असे पर्यंत चालू राहतील.
३) सदर पदे आकृती बंधानुसार मंजूर असतील.

४) उपरोक्त सर्व पदे व्यपगत झालेली नसतील.

५) यानंतर शासनास सादर करण्यात येणारे विहित प्रपत्र प्रमाणपत्र त्या त्या कालावधीच्या दिनांकासहीत प्रस्ताव विहित प्रपत्र, प्रमाणपत्रासह, रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवरील पदांचे नावे व सेवानिवृत्तीच्या दिनांकसह सादर करण्यात यावेत.

यावर होणारा खर्च " मागणी क्रमांक आय-५, मुख्य लेखाशीर्ष ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, ८०, सर्वसाधारण, १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे, (०४) विविध पाटबंधारे विकास महामंडळाना भागभांडवली अंशदान (वेतन), (०४)(०२) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (अनिवार्य)(संगणक संकेतांक (४७०१ आय १७१) (दत्तमत)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व त्याखालील मंजूर अनुदानातून भागवावा.

हे आदेश वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ०८.०२.२०२३ अन्वये विभागास दिलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०३२९१७४८२६९१२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

ABHAY KESHAORAO YEDSIKAR

Digitally signed by ABHAY KESHAORAO YEDSIKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=5724dd2e45895f7c2ab554c8d0b0041f388e5f397467c37bb907e6cc635bd0fd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5B9CED1C6530163B6C7A287499C459AF544860D5330D82DBE50D22D67820C373, cn=ABHAY KESHAORAO YEDSIKAR
Date: 2023.03.29 17:53:49 +05'30'

**( अभय येडसीकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**सहपत्र : परिशिष्ट - "अ"**

**प्रत : सहपत्रासह**

१. महालेखापाल - १ / २ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
२. महालेखापाल - १ / २ (लेखा परीक्षा ) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
३. वित्त विभाग /(व्यय-१२), मंत्रालय, मुंबई.
४. कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांना कळविण्यात येते की,
   प्रस्तुत शासन निर्णयान्वये मंजुरी दिलेल्या अधिकारी/कर्मचारी यांच्या व्यतिरिक्त इतर अधिकारी/कर्मचारी यांची वेतन व देयके अदा केल्यास तसेच या शासन निर्णयान्वये दिलेल्या मंजूरीचा प्रत्यक्ष/अप्रत्यक्ष चुकीचा अर्थ लावून अन्य अधिकारी/कर्मचारी यांची वेतन देयके अदा केल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी आहरण व संवितरण अधिकाऱ्यांवर राहील. त्याचप्रमाणे अस्थायी पदांना मुदतवाढ देत असताना, वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयातील सूचना/अटींची पूर्तता होत असल्याबाबत खातरजमा करण्याबाबतची जबाबदारी आहरण व संवितरण अधिकाऱ्यांवर राहील.
५. मोप्र-२ संग्रहार्थ.

**परिशिष्ट - अ**

**शासन निर्णय : मुदतवाढ -२०२३/प्र.क्र. ११६ /मो.प्र.२, दिनांक २१.०३.२०२३.**
**नियत अस्थायी आस्थापनेवरील १० पदे (दिनांक ०१.०३.२०२३ ते ३१.०८.२०२३)**

| अ.क्र. | कार्यालयाचे नाव | | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|---|---|
| १ | कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर | १ | कार्यकारी संचालक | १ |
| | | २ | मुख्य लेखा व वित्त अधिकारी | १ |
| | | ३ | अधीक्षक अभियंता | १ |
| | | ४ | सहायक संचालक (वित्त) | १ |
| | | ५ | लेखा अधिकारी ( महावित्त व लेखा सेवा) | ३ |
| | | ६ | सहायक लेखा अधिकारी | ३ |
| | | | **एकूण पदे** | **१०** |